पोलीस उपनिरीक्षक पूर्व परीक्षा - 2012



परीक्षा दि: 22 एप्रिल, 2012

Code : **ERM**

प्रश्नपुस्तिका क्रमांक
BOOKLET No. **249525**

## प्रश्नपुस्तिका
## सामान्य क्षमता चाचणी

वेळ : दीड तास

एकूण प्रश्न : **150**
एकूण गुण : **300**

## सूचना

(1) सदर प्रश्नपुस्तिकेत **150** अनिवार्य प्रश्न आहेत. उमेदवारांनी प्रश्नांची उत्तरे लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी या प्रश्नपुस्तिकेत सर्व प्रश्न आहेत किंवा नाहीत याची खात्री करून घ्यावी. असा तसेच अन्य काही दोष आढळल्यास ही प्रश्नपुस्तिका समवेक्षकांकडून लगेच बदलून घ्यावी.

(2) आपला परीक्षा-क्रमांक ह्या चौकोनांत **न विसरता बॉलपेनने लिहावा.**

| परीक्षा-क्रमांक | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|

केंद्राची संकेताक्षरे — शेवटचा अंक

(3) वर छापलेला प्रश्नपुस्तिका क्रमांक तुमच्या उत्तरपत्रिकेवर विशिष्ट जागी उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे **न विसरता** नमूद करावा.

(4) अ) या प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाला 4 पर्यायी उत्तरे सुचविली असून त्यांना 1, 2, 3 आणि 4 असे क्रमांक दिलेले आहेत. त्या चार उत्तरांपैकी सर्वात योग्य उत्तराचा क्रमांक उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे तुमच्या उत्तरपत्रिकेवर नमूद करावा. अशा प्रकारे उत्तरपत्रिकेवर उत्तरक्रमांक नमूद करताना तो संबंधित प्रश्नक्रमांकासमोर छायांकित करून दर्शविला जाईल याची काळजी घ्यावी. **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

ब) **आयोगाने ज्या विषयासाठी मराठी बरोबर इंग्रजी माध्यम विहित केलेले आहे. त्या विषयाचा प्रत्येक प्रश्न मराठी बरोबर इंग्रजी भाषेत देखील छापण्यात आला आहे. त्यामधील इंग्रजीतील किंवा मराठीतील प्रश्नामध्ये मुद्रणदोषांमुळे अथवा अन्य कारणांमुळे विसंगती निर्माण झाल्याची शंका आल्यास, उमेदवाराने संबंधित प्रश्न पर्यायी भाषेतील प्रश्नाशी ताडून पहावा.**

(5) सर्व प्रश्नांना समान गुण आहेत. यास्तव सर्व प्रश्नांची उत्तरे द्यावीत. घाईमुळे चुका होणार नाहीत याची दक्षता घेऊनच शक्य तितक्या वेगाने प्रश्न सोडवावेत. क्रमाने प्रश्न सोडविणे श्रेयस्कर आहे पण **एखादा प्रश्न कठीण वाटल्यास त्यावर वेळ न घालविता पुढील प्रश्नाकडे वळावे.** अशा प्रकारे शेवटच्या प्रश्नापर्यंत पोहोचल्यानंतर वेळ शिल्लक राहिल्यास कठीण म्हणून वगळलेल्या प्रश्नांकडे परतणे सोईस्कर ठरेल.

(6) उत्तरपत्रिकेत एकदा नमूद केलेले उत्तर खोडता येणार नाही. नमूद केलेले उत्तर खोडून नव्याने उत्तर दिल्यास ते तपासले जाणार नाही.

(7) **प्रस्तुत परीक्षेच्या उत्तरपत्रिकांचे मूल्यांकन करताना उमेदवाराच्या उत्तरपत्रिकेतील योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. तसेच "उमेदवाराने वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरूपाच्या प्रश्नांची अचूक उत्तरेच उत्तरपत्रिकेत नमूद करावीत. अन्यथा त्यांच्या उत्तरपत्रिकेत सोडविलेल्या प्रत्येक चार चुकीच्या उत्तरांसाठी एका प्रश्नाचे गुण वजा करण्यात येतील".**

पर्यवेक्षकांच्या सूचनेविना हे सील उघडू नये

## ताकीद

**ह्या प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपेपर्यंत ही प्रश्नपुस्तिका आयोगाची मालमत्ता असून ती परीक्षाकक्षात उमेदवाराला परीक्षेसाठी वापरण्यास देण्यात येत आहे. ही वेळ संपेपर्यंत सदर प्रश्नपुस्तिकेची प्रत/प्रती, किंवा सदर प्रश्नपुस्तिकेतील काही आशय कोणत्याही स्वरूपात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे कोणत्याही व्यक्तीस पुरविणे, तसेच प्रसिद्ध करणे हा गुन्हा असून अशी कृती करणाऱ्या व्यक्तीवर शासनाने जारी केलेल्या "परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचा अधिनियम-82" यातील तरतुदीनुसार तसेच प्रचलित कायद्याच्या तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.**

**तसेच ह्या प्रश्नपत्रिकेसाठी विहित केलेली वेळ संपण्याआधी ही प्रश्नपुस्तिका अनधिकृतपणे बाळगणे हा सुद्धा गुन्हा असून तसे करणारी व्यक्ती आयोगाच्या कर्मचारीवृंदापैकी, तसेच परीक्षेच्या पर्यवेक्षकीयवृंदापैकी असली तरीही अशा व्यक्तीविरुद्ध उक्त अधिनियमानुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती शिक्षेस पात्र होईल.**

**पुढील सूचना प्रश्नपुस्तिकेच्या अंतिम पृष्ठावर पहा**

1. जर राम 100 पावले, 25 पावले प्रती मिनिट वेगाने चालला, 200 पावले, 50 पावले प्रती 30 सेकंद वेगाने चालला व 200 पावले, 1000 पावले प्रती अर्धा तास वेगाने चालला व त्याचे प्रत्येक पाऊल एक मीटरचे असेल तर तो अर्धा किलोमिटर अंतर किती वेळेत चालेल ?

(1) 8 मिनिट (2) 12 मिनिट
(3) 16 मिनिट (4) 20 मिनिट

If Ram covers 100 steps, at the rate of 25 steps per minute, 200 steps at 50 steps per 30 seconds and 200 steps at 1000 steps per half an hour and if his every step measures a meter how much time would he take to cover half a kilometer ?

(1) 8 minutes (2) 12 minutes
(3) 16 minutes (4) 20 minutes

2. एका व्यक्तीने 2,000 रुपयाचे कर्ज 4 हप्त्यांत परत केले व प्रत्येक हप्त्यांत त्या आधीच्या हप्त्यापेक्षा 50 रु. जास्त दिले, तर पहिला हप्ता किती रुपयाचा होता ?

(1) 375 (2) 425 (3) 475 (4) 525

A person borrowed a loan of Rs. 2,000 and paid back in 4 instalments. Each instalment is more than the previous instalment by 50 Rs. then what is the amount of first instalment he paid ?

(1) 375 (2) 425 (3) 475 (4) 525

3. एका संख्येची 7 पट व 4 पट यांची बेरीज 66 आहे तर त्या संख्येच्या तेव्हढ्याच पटीच्या संख्यांची वजाबाकी किती होईल ?

(1) 16 (2) 24 (3) 22 (4) 18

The sum of 7 times and 4 times of a given number is 66 then, what is the result if the second figure is subtracted (instead of adding) from the first ?

(1) 16 (2) 24 (3) 22 (4) 18

4. $0.004 \times 0.5 = ?$

(1) 0.00020 (2) 0.0020 (3) 0.0200 (4) 0.2000

$0.004 \times 0.5 = ?$

(1) 0.00020 (2) 0.0020 (3) 0.0200 (4) 0.2000

5. एका वर्गातील 40 विद्यार्थ्यांच्या वयाची सरासरी 10 वर्षे आहे. जर शिक्षकाचे वय विद्यार्थ्यांच्या वयात मिळविले तर सरासरी 11 येते. तर शिक्षकाचे वय किती ?

(1) 51 वर्षे (2) 50 वर्षे (3) 48 वर्षे (4) 45 वर्षे

In a class, the average age of 40 students is 10. If teacher's age is added to student's age, then the average becomes 11. What is the age of the teacher ?

(1) 51 Years (2) 50 Years (3) 48 Years (4) 45 Years

 

**6.** त्रिकोणाच्या दोन कोनांची मापे 62.6 अंश आणि 56.7 अंश आहेत. तर त्याच्या तिसऱ्या कोनाचे माप किती ?

(1) 118.3 अंश (2) 14.3 अंश (3) 60.7 अंश (4) यापैकी नाही

Two angles of a triangle are 62.6° and 56.7° then what is the third angle of the triangle ?

(1) 118.3° (2) 14.3° (3) 60.7° (4) None of the above

---

**7.** $(15-2)^2 = ?$

(1) 221 (2) 169 (3) 13 (4) यापैकी नाही

$(15-2)^2 = ?$

(1) 221 (2) 169 (3) 13 (4) None of the above

---

**8.** 80 या संख्येचे चार भाग असे पाडा की पहिल्यामध्ये 3 मिळविले, दुसऱ्यामधून 3 वजा केले. तिसऱ्याला 3 ने गुणले व चौथ्याला 3 ने भागले तरी सर्व उत्तरे समान येतात. या चार भागांपैकी सर्वात लहान भाग 5 आहे तर सर्वात मोठा भाग किती असेल ?

(1) 45 (2) 50 (3) 55 (4) 60

The number 80 is divided into four so that if 3 is added to the first, 3 is subtracted from the second, the third is multiplied by 3 and the fourth is divided by 3 all give the same value. The lowest number is 5, what is the highest number ?

(1) 45 (2) 50 (3) 55 (4) 60

---

**9.** एक सरळ असलेला महामार्ग एक 50 मी. उंच मनोऱ्याच्या तळाकडे जातो. जर मनोऱ्याच्या वरच्या टोकापासून महामार्गावरील दोन मोटारींकडे पाहण्याचे अवनत कोन 30° आणि 60° मापाचे आहेत. तर त्या दोन मोटारींमधील अंतर ________ मीटर असेल.

(1) $\frac{100\sqrt{3}}{3}$ (2) $\frac{100}{3}$ (3) $\frac{300}{\sqrt{3}}$ (4) $\frac{300\sqrt{3}}{3}$

A straight highway leads to the base of a 50 meter tall tower. From the top of the tower, if the angles of depression of two cars on the road are 30° and 60°, then the distance between the two cars is ________ m.

(1) $\frac{100\sqrt{3}}{3}$ (2) $\frac{100}{3}$ (3) $\frac{300}{\sqrt{3}}$ (4) $\frac{300\sqrt{3}}{3}$

---

**10.** खालीलपैकी कोणती संख्या पूर्ण वर्ग आहे ?

(1) 6242 (2) 6248 (3) 6241 (4) 6243

Which of the following numbers is a perfect square ?

(1) 6242 (2) 6248 (3) 6241 (4) 6243

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

**11.** खाली दिलेल्या समीकरणांमध्ये + व ÷ ही चिन्हे तसेच 2 आणि 4 ह्या संख्यांची अदलाबदल केली तर कोणते समीकरण बरोबर येईल ?

(1) $2 + 4 \div 3 = 3$ (2) $4 + 2 \div 6 = 1.5$ (3) $4 \div 2 + 3 = 2$ (4) $2 + 4 \div 6 = 8$

In the given equations if the signs + and ÷ as well as numbers 2 and 4 are interchanged, then which of the following equations would be correct ?

(1) $2 + 4 \div 3 = 3$ (2) $4 + 2 \div 6 = 1.5$ (3) $4 \div 2 + 3 = 2$ (4) $2 + 4 \div 6 = 8$

**12.** खालीलपैकी कोणत्या पर्यायातील संख्या उतरत्या क्रमाने आहेत ?

(1) $\sqrt[4]{6}, \sqrt[6]{5}, \sqrt[3]{2}$ (2) $\sqrt[6]{5}, \sqrt[4]{6}, \sqrt[3]{2}$

(3) $\sqrt[4]{6}, \sqrt[3]{2}, \sqrt[6]{5}$ (4) $\sqrt[6]{5}, \sqrt[3]{2}, \sqrt[4]{6}$

In which of the following alternatives the numbers are in the descending order ?

(1) $\sqrt[4]{6}, \sqrt[6]{5}, \sqrt[3]{2}$ (2) $\sqrt[6]{5}, \sqrt[4]{6}, \sqrt[3]{2}$

(3) $\sqrt[4]{6}, \sqrt[3]{2}, \sqrt[6]{5}$ (4) $\sqrt[6]{5}, \sqrt[3]{2}, \sqrt[4]{6}$

**13.** $5^m \div 5^{-3} = 5^5$ या समीकरणामधील m ची किंमत काढा.

(1) 2 (2) 3 (3) 5 (4) 8

Find the value of m in the equation $5^m \div 5^{-3} = 5^5$

(1) 2 (2) 3 (3) 5 (4) 8

**14.** $(x^2 + 3x)(x - 3)x$ आणि $x^2(x^3 - 27)$ चा ल.सा.वि. ________ आहे.

(1) $x^2(x + 3)(x - 3)$ (2) $x(x - 3)(x^3 - 27)$

(3) $x^2(x^2 - 9)(x^2 + 3x + 9)$ (4) $x(x - 3)(x^2 - 3x + 9)$

L.C.M. of $(x^2 + 3x)(x - 3)x$ and $x^2(x^3 - 27)$ is ________

(1) $x^2(x + 3)(x - 3)$ (2) $x(x - 3)(x^3 - 27)$

(3) $x^2(x^2 - 9)(x^2 + 3x + 9)$ (4) $x(x - 3)(x^2 - 3x + 9)$

**15.** एका समाजसेवी संघटनेने 43.7 किलो तांदूळ 12 रु. प्रती किलो ह्या दराने विकत घेतला. त्यांनी तो 152 गरीब लोकांमध्ये समप्रमाणात वाटला. तर प्रत्येक व्यक्तीला मिळालेल्या तांदूळाची किंमत किती ?

(1) 30.40 रु. (2) 3.45 रु. (3) 12.60 रु. (4) 16.80 रु.

A social service group bought 43.7 kg. of rice at Rs. 12 per kg and distributed it equally among 152 poor people. What is the cost of the rice that each person got ?

(1) Rs. 30.40 (2) Rs. 3.45 (3) Rs. 12.60 (4) Rs. 16.80

 

**16.** 280 प्रश्नपत्रिकांच्या गठ्ठ्याची जाडी 3.6 से.मी. आहे. तर 630 प्रश्नपत्रिकाच्या गठ्ठ्याची जाडी किती ?

(1) 8.0 से.मी. (2) 8.1 से.मी.
(3) 7.8 से.मी. (4) 7.5 से.मी.

A stack of 280 question papers has 3.6 cms thickness. How much thick would the stack be of 630 question papers ?

(1) 8.0 cm (2) 8.1 cm
(3) 7.8 cm (4) 7.5 cm

---

**17.** जर $484 \times 144 = 69696$, तर $\sqrt{\frac{69.696}{14.4}} = ?$

(1) 2.2 (2) 2.22 (3) 4.84 (4) 48.4

If $484 \times 144 = 69696$, then $\sqrt{\frac{69.696}{14.4}} = ?$

(1) 2.2 (2) 2.22 (3) 4.84 (4) 48.4

---

**18.** जतिनने 1,570 रु. वाचविले. सविताने जतिनपेक्षा 1,936 रु. जास्त वाचविले. तर त्यांनी एकूण किती रुपये वाचविले ?

(1) 3506 (2) 5076 (3) 4567 (4) 8576

Jatin saved Rs. 1,570. Savita saved Rs. 1,936 more than Jatin. How much did they save all together ?

(1) 3506 (2) 5076 (3) 4567 (4) 8576

---

**19.** एका संख्येला 8 ने गुणले असता त्याच्या येणाऱ्या उत्तरामध्ये जर 99 मिळविले तर अंतिम उत्तर 171 येते. तर ती संख्या कोणती ?

(1) 8 (2) 9 (3) 10 (4) 7

If a number is multiplied by 8 and to the multiplication 99 is added, the answer is 171. What is the original number ?

(1) 8 (2) 9 (3) 10 (4) 7

---

**20.** संतोषने रु. 2.75 प्रती समोसा प्रमाणे 50 समोसे खरेदी केले जर त्याने त्याऐवजी 68.75 प्रती किलोप्रमाणे मिठाई घेतली असती तर त्याला किती किलो मिठाई मिळाली असती ?

(1) $\frac{1}{2}$ kg (2) 1 kg (3) $1\frac{1}{2}$ kg (4) 2 kg

Santosh bought 50 Samosas at the rate of Rs. 2.75 per Samosa. Instead had be brought sweets at the rate of 68.75 Rs. per kg. How much of sweets could he have bought ?

(1) $\frac{1}{2}$ kg (2) 1 kg (3) $1\frac{1}{2}$ kg (4) 2 kg

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

**21.** वातावरणाचा किती भाग नत्रवायु व्यापतो ?

(1) $\frac{1}{3}$ (2) $\frac{1}{2}$ (3) $\frac{3}{4}$ (4) $\frac{4}{5}$

How much of atmosphere is formed of Nitrogen ?

(1) $\frac{1}{3}$ (2) $\frac{1}{2}$ (3) $\frac{3}{4}$ (4) $\frac{4}{5}$

---

**22.** 'सेंद्रीय शेती' प्रकारात, खालीलपैकी काय अपेक्षित नाही ?

(1) जनावरांच्या मल-मूत्रांचा वापर
(2) वनस्पतीजन्य किटकनाशकांचा वापर
(3) रासायनिक खत व किटकनाशकांचा वापर
(4) वरीलपैकी काहीही नाही

Which of the following is not expected in 'Organic farming' ?

(1) Use of animal excreta
(2) Use of botanical insecticides
(3) Use of chemical fertilizers and insecticides
(4) None of the above

---

**23.** ______________ विषाणूच्या संसर्गाने एड्स होतो.

(1) ह्युमन इम्युनो डेफिसियन्सी व्हायरस (2) ह्युमन इनिसिएटीव्ह डेफिसियन्सी व्हायरस
(3) ह्युमन इम्युनो डेंजरस व्हायरस (4) यापैकी नाही

Infection by the ___________ causes AIDS.

(1) Human immuno-deficiency virus (2) Human initiative deficiency virus
(3) Human immuno-dangerous virus (4) None of the above

---

**24.** आम्ल पर्जन्यासाठी खालीलपैकी कोणता घटक जबाबदार आहे ?

(1) $CO_2$ (2) $CH_4$ (3) $H_2S$ (4) $NO_2$ आणि $SO_2$

Which factor is responsible for Acid rain ?

(1) $CO_2$ (2) $CH_4$ (3) $H_2S$ (4) $NO_2$ and $SO_2$

---

**25.** पृथ्वीवर अस्तित्वात असलेल्या सजीवांमधील विविधता म्हणजे ______________

(1) जैवविविधता (2) जीवशास्त्र
(3) जैव तंत्रज्ञान (4) जैव रसायनशास्त्र

The variety that we see in the living things that exists on the earth is called __________

(1) Bio-diversity (2) Biology
(3) Biotechnology (4) Biochemistry

 

**26.** हायड्रोजन या मूलद्रव्याचे वैशिष्ट्य कोणते ?

(1) हायड्रोजनच्या अणूच्या केंद्रकात न्युट्रॉन असतो

(2) हायड्रोजनच्या अणूच्या केंद्रकात न्युट्रॉन नसतो

(3) हायड्रोजनच्या केंद्रकात एकही प्रोटॉन नसतो

(4) हायड्रोजनच्या केंद्रकाभोवती परिभ्रमण करणारे दोन इलेक्ट्रॉन असतात

What is the characteristic property of the hydrogen element ?

(1) The nucleus of hydrogen contains neutron

(2) The nucleus of hydrogen doesnot contain neutron

(3) The nucleus of hydrogen does not contain proton

(4) Two electrons are revolving round the nucleus of hydrogen

---

**27.** गारव्यासाठी रेफ्रीजरंट म्हणून काय वापरतात ?

(1) फ्रेऑन (2) अमोनिया

(3) वरील दोन्ही (4) वरीलपैकी काहीच नाही

What is used as refrigerant ?

(1) Freon (2) Ammonia

(3) Both the above (4) None of the above

---

**28.** प्रत्येकी 16 Ω रोध असणारे चार रोधित्रांची समांतर जोडणी केली. अशा प्रकारच्या चार रोधिकांची एकसरी संयोगी जोडणी केल्यास एकूण परिणामी रोध किती ?

(1) 2Ω (2) 4Ω (3) 8Ω (4) 16Ω

Four resistances of 16Ω each are connected in parallel. Four such combinations are connected in series. What is the total resultant resistance ?

(1) 2Ω (2) 4Ω (3) 8Ω (4) 16Ω

---

**29.** आहारातील ऊर्जेचे प्रमुख स्रोत कोणते ?

(1) प्रथिने (2) कर्बोदके

(3) मेद (4) जीवनसत्त्वे

What is the main source of energy in our diet ?

(1) Proteins (2) Carbohydrates

(3) Fats (4) Vitamins

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

30. जीवनसत्त्वे अ, ब, क, के आणि त्यांच्या अभावामुळे होणारे रोग, याबाबत योग्य जोड्या निवडा.

(1) अ – रातआंधळेपणा, ब – बेरीबेरी
क – रक्तस्त्राव, के – स्कर्व्ही

(2) अ – रातआंधळेपणा, ब – स्कर्व्ही
क – बेरीबेरी, के – रक्तस्त्राव

(3) अ – रातआंधळेपणा, ब – बेरीबेरी
क – स्कर्व्ही, के – रक्तस्त्राव

(4) अ – रातआंधळेपणा, ब – स्कर्व्ही
क – रक्तस्त्राव, के – बेरीबेरी

Choose the alternative giving Vitamins with their correct deficiency diseases

(1) A – nightblindness B – beriberi
C – haemorrhage K – scurvy

(2) A – nightblindness B – scurvy
C – beriberi K – haemorrhage

(3) A – nightblindness B – beriberi
C – scurvy K – haemorrhage

(4) A – nightblindness B – scurvy
C – haemorrhage K – beriberi

---

31. ____________ या पदार्थाच्या बाबतीत विद्युत धारा व विभवांतर यांचा जर आलेख काढला तर तो सरळरेषीय येत नाही व रोधाचे मूल्य स्थिर राहत नाही.

(1) थर्मिस्टर (2) तांबे (3) ॲल्युमिनिअम (4) चांदी

For ____________ the graph of current and voltage is not a straight line and value of resistance is not constant.

(1) Thermistor (2) Copper (3) Aluminium (4) Silver

---

32. ____________ हरित गृह वायु आहेत.

(1) $CH_4$ व $C_2H_6$ (2) $CH_4$ व $CO_2$

(3) $CO_2$ व $C_2H_6$ (4) $C_2H_6$ व $N_2O$

Green house gases are

(1) $CH_4$ and $C_2H_6$ (2) $CH_4$ and $CO_2$

(3) $CO_2$ and $C_2H_6$ (4) $C_2H_6$ and $N_2O$

 

**33.** 20 ग्रॅम बर्फास 1600 कॅलरी उष्णता दिल्यास त्याचे अंतिम तापमान किती होईल ?

(1) 0°C (2) 10°C (3) 20°C (4) 5°C

What will be the final temperature if 1600 cal of heat is given to an ice block of mass 20 grams ?

(1) 0°C (2) 10°C (3) 20°C (4) 5°C

---

**34.** सौर कुकर पेटीच्या आतील भागास काळा रंग दिलेला असतो, कारण काळ्या रंगाचे आवरण ________

(1) त्यावर पडणाऱ्या उष्मा प्रारणाला बाहेर सोडते

(2) त्यावर पडणाऱ्या उष्मा प्रारणाला परावर्तित करते

(3) त्यावर पडणाऱ्या उष्मा प्रारणाला अमान्य करते

(4) त्यावर पडणाऱ्या उष्मा प्रारणाला शोषून घेते

The inner surface of the solar cooker box is painted black, because the black surface ____________

(1) emits the incident heat radiation

(2) reflects the incident heat radiation

(3) refuses the incident heat radiation

(4) absorbs the incident heat radiation

---

**35.** व्हर्नियर कैवारच्या व्हर्नियर स्केल वर 25 खुणा असून मुख्य मापणपट्टीवरील लघुत्तम अंतर 1 मी. मी. आहे म्हणून व्हर्नियर कैवारचे लघुत्तम माप किती मी. मी. येईल ?

(1) 0.25 (2) 0.04 (3) 2.5 (4) 1.25

On Vernier scale of Vernier calliper there are 25 lines and on main scale smallest division is 1 mm then least count of Vernier calliper is

(1) 0.25 (2) 0.04 (3) 2.5 (4) 1.25

---

**36.** केक आणि पाव हलके व सछिद्र बनविण्यासाठी __________ चा उपयोग करतात.

(1) सोडिअम कार्बोनेट (2) सोडिअम बायकार्बोनेट

(3) कॅल्शीअम कार्बोनेट (4) ब्लीचिंग पावडर

________ is used in the preparation of cakes and bread to make them light and spongy.

(1) Sodium carbonate (2) Sodium bicarbonate

(3) Calcium carbonate (4) Bleaching powder

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

**37.** मूलद्रव्याचा अणु हा विद्युतदृष्ट्या कसा असतो ?

(1) ऋणप्रभारित (2) उदासीन

(3) धनप्रभारित (4) प्रवाही

An atom of element is electrically

(1) Negatively charged (2) Neutral

(3) Positively charged (4) Conductor

---

**38.** कवक पेशीची पेशीभित्तीका कोणत्या जटील शर्करेपासून बनलेली आहे ?

(1) सेल्युलोज (2) ग्लुकोज

(3) सुक्रोज (4) कायटिन

Cell wall of fungi is made up of tough and complex sugars called

(1) Cellulose (2) Glucose

(3) Sucrose (4) Chitin

---

**39.** खालीलपैकी कोणत्या रोगाची लागण दूषित अन्न किंवा दूषित पाणी ग्रहण केल्याने होते ?

(1) टायफॉईड (2) क्षय

(3) रॅबीज (4) पोलिओ

Which disease is contacted by ingestion of contaminated food or water ?

(1) Typhoid (2) Tuberculosis

(3) Rabies (4) Polio

---

**40.** खालीलपैकी उडणारा सस्तन प्राणी कोणता ?

(1) पोपट (2) वटवाघूळ (3) घुबड (4) घार

Which of the following is a flying mammal ?

(1) Parrot (2) Bat (3) Owl (4) Kite

---

**41.** इ. स. 1857 च्या उठावाचे वैशिष्ट्य म्हणजे ________________ ऐक्य होय.

(1) हिंदु-मुस्लिम (2) मराठा–शिख

(3) इंग्लिश–मुस्लिम (4) इंग्लिश–मराठा

The 'Revolt of 1857 A.D.' prominently revealed ______________ unity.

(1) Hindu-Muslim (2) Maratha-Shikh

(3) English-Muslim (4) English-Maratha

---



**42.** इ. स. 1857 च्या उठावाचे तात्कालिक कारण होते ________

(1) गाईची व डुक्कराची चरबी लावलेल्या काडतुसांचा उपयोग

(2) अनेक संस्थाने खालसा करणे

(3) ख्रिश्चन धर्म प्रसार करणे

(4) पदव्या, वतने आणि पेन्शन रद्द करणे

The immediate cause of the revolt of 1857 was the ____________

(1) Use of cartridges greased with cow fat and pig fat

(2) Annexation of several states

(3) The spread of Christianity

(4) Abolition of titles, vatans and pensions

---

**43.** इ. स. 1857 च्या उठावानंतर कोणत्या तारखेस भारताची सत्ता इंग्लंडच्या राणीकडे हस्तांतरित करण्यात आली ?

(1) 1 डिसेंबर 1859 (2) 1 डिसेंबर 1858

(3) 1 नोव्हेंबर 1857 (4) 1 नोव्हेंबर 1858

After the revolt of 1857, on which date all the powers of the Indian State were transferred to the Queen of England.

(1) 1st December 1859 (2) 1st December 1858

(3) 1st November 1857 (4) 1st November 1858

---

**44.** इ. स. 1875 मध्ये ____________ यांनी 'इंडियन लीगची' स्थापना केली.

(1) आनंद मोहन बोस (2) शिशिर कुमार बोस

(3) मनमोहन बोस (4) व्योमेशचंद्र बॅनर्जी

During 1875 ______________ established the 'Indian League'.

(1) Anand Mohan Bose (2) Shishir Kumar Bose

(3) Man Mohan Bose (4) Wyomeshchandra Bannerji

---

**45.** खालीलपैकी कोणत्या कायद्यात वा योजनेत अस्पृश्यांसाठी स्वतंत्र मतदार संघ तयार करण्याची तरतूद होती ?

(1) माँटेग्यू-चेम्सफोर्ड कायदा (2) रॅम्से-मॅक्डोनाल्ड निवाडा

(3) वेव्हेल योजना (4) 1935 चा सुधारणा कायदा

Separate Electorates for the untouchables were granted by ____________

(1) Montegue-Chemsford Act (2) Ramase-McDonald Award

(3) Wavel Plan (4) Indian Act 1935

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

**46.** भारतीय राष्ट्रीय कॉंग्रेसचे पहिले अधिवेशन पुण्याऐवजी मुंबईस भरविण्यात आले होते कारण ________

(1) पुणेकरांनी अधिवेशनाला विरोध दर्शविल्यामुळे

(2) मुंबईतील जनतेच्या आग्रहामुळे

(3) पुण्यास आकस्मिकरित्या साथीच्या रोगाचा प्रादुर्भाव झाल्यामुळे

(4) मुंबईला आंतरराष्ट्रीय महत्त्व असल्यामुळे

The first conference of Indian National Congress was shifted from Pune to Mumbai ________

(1) Due to the opposition of the people of Pune

(2) Due to the demand of the people of Mumbai

(3) Due to the outbreak of viral diseases in Pune

(4) Due to the International importance of Mumbai

---

**47.** पुण्याचे प्लेग कमिशनर रँड यांची 1893 मध्ये ________ याने हत्या केली.

(1) दामोदर हरि चापेकर (2) वासुदेव बळवंत फडके

(3) उस्ताद लहुजी मांग (4) अनंत कान्हेरे

Mr. Rand, the Plague Commissioner of Pune was assassinated in the year 1893 by ________

(1) Damodar Hari Chaphekar (2) Vasudeo Balawant Phadake

(3) Ustad Lahuji Mang (4) Anant Kanhere

---

**48.** मुस्लिम लीगची स्थापना कोठे झाली ?

(1) ढाका (2) कोलकाता (3) चितगांव (4) मुर्शिदाबाद

Where was the Muslim League founded ?

(1) Dhaka (2) Kolkata (3) Chitagaon (4) Murshidabad

---

**49.** बंगालची फाळणी कोणत्या गव्हर्नर जनरलने केली ?

(1) लॉर्ड रिपन (2) लॉर्ड डफरीन

(3) लॉर्ड डलहौसी (4) लॉर्ड कर्झन

Which Governor General was responsible for partition of Bengal ?

(1) Lord Rippon (2) Lord Duffrin

(3) Lord Dalhousie (4) Lord Curzon

 

**50.** बार्डोलीचा सत्याग्रह ________ यांच्या नेतृत्त्वाखाली झाला.

(1) सरदार पटेल (2) म. गांधी
(3) विनोबा भावे (4) महादेव देसाई

__________ led the Bardoli Satyagraha.

(1) Sardar Patel (2) M. K. Gandhi
(3) Vinoba Bhave (4) Mahadeo Desai

---

**51.** भारताचे 'पितामह' म्हणून कोणास ओळखले जाते ?

(1) न्यायमूर्ती रानडे (2) फिरोजशहा मेहता
(3) रविंद्रनाथ टागोर (4) दादाभाई नौरोजी

Who is known as the 'Grand Old Man' of India ?

(1) Justice Ranade (2) Ferozshah Mehata
(3) Rabindranath Tagore (4) Dadabhai Nauroji

---

**52.** महाराष्ट्रातील आद्य क्रान्तिकारक कोण होते ?

(1) राजाराम मोहन रॉय (2) दादाभाई नौरोजी
(3) वि. दा. सावरकर (4) वासुदेव बळवंत फडके

From among the following who was the earliest revolutionary in Maharashtra ?

(1) Raja Ram Mohan Rai (2) Dadabhai Nouroji
(3) V. D. Savarkar (4) Vasudeo Balwant Phadake

---

**53.** महाराष्ट्रात होमरूल लीगची चळवळ ________ यांनी सुरु केली.

(1) महात्मा गांधी (2) महात्मा फुले
(3) पंडित नेहरु (4) लोकमान्य टिळक

__________ was the founder of Home Rule movement in Maharashtra.

(1) Mahatma Gandhi (2) Mahatma Phule
(3) Pandit Nehru (4) Lokmanya Tilak

---

**54.** इ. स. 1911 मध्ये बंगालची फाळणी रद्द झाल्याची घोषणा ________ याने केली.

(1) लॉर्ड कर्झन (2) पंचम जॉर्ज
(3) इंग्लंड सरकार (4) ब्रिटीश पार्लमेंट

The declaration of cancellation of the partition of Bengal in 1911 was done by ________

(1) Lord Curzon (2) V Georje
(3) Govt. of England (4) British Parliament

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

**55.** खालीलपैकी स्वराज्य पक्षाचे संस्थापक सदस्य कोण होते ?

(1) महात्मा गांधी
(2) लोकमान्य टिळक
(3) चित्तरंजन दास
(4) न्यायमूर्ती रानडे

From among the following who was the founder member of the Swaraj Party ?

(1) Mahatma Gandhi
(2) Lokmanya Tilak
(3) Chitaranjan Das
(4) Justice Ranade

---

**56.** स्वराज्य पक्षाचे ध्येय काय होते ?

(1) परकीय वस्तुवर बहिष्कार टाकणे
(2) भारतीय उद्योगांना पाठिंबा देणे
(3) ब्रिटिश साम्राज्यान्तर्गत स्वराज्य
(4) असहकार चळवळ सुरु करणे

What was the aim of the 'Swaraj Party' ?

(1) Boycott the foreign goods
(2) Support the Indian Industries
(3) Dominion status
(4) Non co-operation movement

---

**57.** भारताचे गव्हर्नर जनरल केंव्हापासून व्हॉईसरॉय म्हणून ओळखले जाऊ लागले ?

(1) इ. स. 1855 (2) इ. स. 1856 (3) इ.स. 1857 (4) इ. स. 1858

Since when was the Governor General of India known as the Vice-roy of India ?

(1) 1855 A. D. (2) 1856 A. D. (3) 1857 A. D. (4) 1858 A. D.

---

**58.** चंद्रशेखर आझादांच्या नेतृत्त्वाखाली सरदार भगतसिंगांनी 1928 मध्ये कोणती संघटना स्थापन केली ?

(1) नवजीवन सैनिक संघ
(2) गदर
(3) हिंदुस्थान सोशॅलीस्ट रिपब्लिकन असोसिएशन
(4) नवभारत

Under the leadership of Chandrashekar Azad, which organisation was established by Sardar Bhagat Singh during 1928 ?

(1) Nawajeewan Sainik Sangh
(2) Gadar
(3) Hindustan Socialist Republican Association
(4) Navabharat

---

**59.** बॉम्बे-ठाणे रेल्वे कोणत्या वर्षी सुरु झाली ?

(1) 1852 (2) 1853 (3) 1854 (4) 1855

In which year were Bombay and Thane connected by rail ?

(1) 1852 (2) 1853 (3) 1854 (4) 1855

---

 

**60.** महाराष्ट्रातील सामाजिक, धार्मिक सुधारणा चळवळीतील कोणते प्रसिद्ध सुधारक 'लोकहितवादी' या नावाने ओळखले जात होते ?

(1) ज्योतीबा फुले (2) महादेव गोविंद रानडे
(3) गोपाळ हरि देशमुख (4) गोपाळ गणेश आगरकर

Which social and religious reformer from Maharashtra was popularly known as Lokhitwadi ?

(1) Jyotiba Phule (2) Mahadeo Govind Ranade
(3) Gopal Hari Deshmukh (4) Gopal Ganesh Agarkar

---

**61.** चंपारण्य सत्याग्रहाचे नेतृत्त्व कोणी केले ?

(1) महात्मा फुले (2) महात्मा गांधी
(3) लोकमान्य टिळक (4) वि. दा. सावरकर

Who led the Champaranya Satyagraha ?

(1) Mahatma Phule (2) Mahatma Gandhi
(3) Lokmanya Tilak (4) V. D. Savarkar

---

**62.** 'पॉव्हर्टी ॲन्ड अनब्रिटिश रूल इन इंडिया' हा ग्रंथ कोणी लिहिला ?

(1) दादाभाई नौरोजी (2) लाला लजपतरॉय
(3) वि. दा. सावरकर (4) लोकमान्य टिळक

____________ is the author of the book "Poverty and Unbritish Rule in India".

(1) Dadabhai Nauroji (2) Lala Lajpatroy
(3) V. D. Savarkar (4) Lokmanya Tilak

---

**63.** ब्राह्मो समाजाची स्थापना कोणी केली ?

(1) हेन्री डेरोझिओ (2) महर्षी धोंडो केशव कर्वे
(3) पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर (4) राजाराम मोहन रॉय

Who founded the Brahmo Samaj ?

(1) Henry-De-ro-Zeo (2) Maharshi Dhondo Keshav Karve
(3) Pandit Ishwarchandra Vidyasagar (4) Raja Ram Mohan Roy

---

**64.** 'तुम्ही मला रक्त द्या, मी तुम्हाला स्वातंत्र्य देईन' हे कोणी म्हंटले ?

(1) सुभाष चंद्र बोस (2) नारायण गुरु
(3) सुखदेव (4) भगत सिंग

Who said 'You give me blood, I will give you freedom.' ?

(1) Subhash Chandra Bose (2) Narayan Guru
(3) Sukhadeo (4) Bhagat Singh

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

